**समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण) कार्यक्रमासाठी Ad-hoc हप्त्याचा निधी (सर्वसाधारण हिस्सा) वितरीत करणेबाबत (केंद्र व राज्य हिस्सा).**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०२०/प्र.क्र.१११ भाग-१/एस.डी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०९ ऑक्टोबर, २०२०

<u>वाचा :-</u>

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६/०४/२०२०
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४/०५/२०२०
३) केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली आदेश क्रमांक : ७-२/२०२०-IS-१२ (GEN), दिनांक ०५/०८/२०२०
४) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र. मप्राशिप /लेखा-२/Ad-hoc/REC/(Gen., SC, ST) निधी मागणी/२०२०-२१/१८५३, दि.१५/०९/२०२०

<u>प्रस्तावना:-</u>

समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण ) योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र : राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने दिनांक ०५/०८/२०२० रोजीच्या आदेशान्वये प्राथमिक शिक्षणासाठी केंद्र शासनाचा Ad-hoc हप्त्याचा आवर्ती (सर्वसाधारण हिस्सा) रु.१२१,८७,९१,०००/- इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला आहे. सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्याचा निधी रु.८१,२५,२७,३३३/- इतका येतो.

राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. वित्त विभागाच्या दि.०४/०९/२०२० रोजीच्या ईमेल अन्वये केंद्र हिस्सा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे अभिप्राय प्राप्त झाले आहेत. वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४३३/व्यय-५ दिनांक ३०/०९/२०२० अन्वये एकूण अर्थसंकल्पीय तरतूदीच्या २५ टक्के निधी वितरणास अनुमती प्राप्त झाली आहे. त्यानुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

<u>शासन निर्णय-</u>

केंद्र शासनाने उपरोक्त प्रमाणे निधी उपलब्ध करून दिल्याप्रमाणे प्राथमिक शिक्षणासाठी रू.१८९,७७,९१,६६७/-(रूपये एकशे एकोणनव्वद कोटी सत्याहत्तर लक्ष एक्यान्नव हजार सहाशे सदुसष्ठ फक्त) इतका निधी सोबतच्या विवरणपत्र-अ मध्ये दर्शविल्यानुसार कार्यक्रमनिहाय खर्च करण्यासाठी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी उपरोक्त विवरणपत्र-अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे कार्यक्रमनिहाय निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी व त्यांचे स्तरावर कार्यक्रमनिहाय खर्चामध्ये बदल करण्यात येवू नये.

३. प्राथमिक शिक्षणासाठी वितरीत करावयाच्या उपरोक्त तरतूदीचा लेखाशिर्षनिहाय तपशील खालील प्रमाणे आहे. सदर खर्च खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रामणे सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतूदीमधून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पित तरतूद | वितरीत तरतूद (रक्कम - रूपये) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६-शिक्षक व इतर खर्च, (०१) समग्र शिक्षा अभियान, (०१) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) **(केंद्र हिस्सा ६० टक्के**), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर), (२२०२ ।६२१)" | रु.९०० कोटी | रू. १२१,८७,९१,०००/- |
| २ | "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६-शिक्षक व इतर खर्च, (०१) समग्र शिक्षा अभियान, (०१) (०२) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) **(राज्य हिस्सा ४० टक्के**), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर), (२२०२ ।६१२)" | रु.५०० कोटी | रू. ६७,९०,००,६६७/- |
| | **एकूण** | | **रू. १८९,७७,९१,६६७/-** |

४. वित्त विभागाच्या दि.१६/०४/२०२० व दि.०४/०५/२०२० रोजीच्या परिपत्रकात नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाचे दि.०५/०८/२०२० रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०२०-२१ च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा अंतर्गत प्राथमिक शिक्षण शिक्षणाच्या चालू योजनांच्या आवर्ती खर्चासाठी सोबतच्या विवरणपत्र-अ नुसार खर्च करावा. RTE २५% प्रवेश प्रतिपूर्ती पोटी राज्य शासनाने केलेल्या खर्चाची भरपाई यासाठी वितरीत केलेले अनुदान राज्याच्या एकत्रित निधीत त्वरित जमा करण्यात यावी.

६. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६/०४/२०२० व दि.०४/०५/२०२० रोजीच्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६/०४/२०२० व दि.०४/०५/२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये, वित्त विभागाच्या दि.०४/०९/२०२० रोजीच्या ईमेल व अनौपचारिक संदर्भ क्र.४३३/व्यय-५, दि.३०/०९/२०२० अन्वये तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८९/१४७१, दि.२१/०९/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१००९१६१७३७२०२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: CN = RAJENDRA SHANKARRAO PAWAR, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT
Date: 2020.10.09 16:19:37 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
४) मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
६) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
७) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
९) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
१०) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
११) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१२) उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) वित्त विभाग, (व्यय-५ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१४) अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखा शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती (एस.डी.१).

## विवरणपत्र-अ

**समग्र शिक्षा कार्यक्रमाखाली प्राथमिक शिक्षण अंतर्गत उपक्रमनिहाय मंजूर करण्यात येत असलेला निधी (केंद्र व राज्य हिस्सा)**

**शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०२०/प्र.क्र.१११ भाग-१/एस.डी-१, दिनांक : ०९ ऑक्टोबर, २०२० सोबतचे विवरणपत्र (रक्कम रुपयात)**

| अ.क्र. | उपक्रम | प्राथमिक | | |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा (रु.) | राज्य हिस्सा (रु.) | एकूण (रु.) |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | निवासी शाळा / वसतीगृहे | ३०,००,००० | २०,००,००० | ५०,००,००० |
| २. | मोफत पाठ्यपुस्तके | ६५,००,००,००० | ३५,००,००,००० | १००,००,००,००० |
| ३. | आर.टी.ई. ॲक्ट अंतर्गत २५ टक्के राखीव जागांवरील विद्यार्थ्यांची शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती | १५,००,३७,००० | ९,९९,६३,००० | २५,००,००,००० |
| ४. | जाहिरात व प्रसिध्दी Media and community population | ३,१२,०८,००० | २,०८,००,००० | ५,२०,०८,००० |
| ५. | ग्रंथालय अनुदान | ७,००,५०,००० | ३,००,००,००० | १०,००,५०,००० |
| ६. | शाळांना सानुग्रह अनुदान Composite School Grant | १५,००,१६,००० | १०,००,००,००० | २५,००,१६,००० |
| ७. | BRC/URC/CRC मार्फत शैक्षणिक सहाय्य | १४,९४,८०,००० | ६,६२,३७,६६७ | २१,५७,१७,६६७ |
| ८. | कस्तुरबा गांधी बालिका विद्यालय | १,५०,००,००० | १,००,००,००० | २,५०,००,००० |
| | **एकूण** | **१२१,८७,९१,०००** | **६७,९०,००,६६७** | **१८९,७७,९१,६६७** |

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: CN = RAJENDRA SHANKARRAO PAWAR, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT
Date: 2020.10.09 16:20:00 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन